उप विभागीय अभियंता (स्थापत्य) या संवर्गातून कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-११२५/प्र.क्र.१२५(२)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०६ जून, २०२५

**संदर्भ :-** **१.** सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश, क्र.पदोन्न-११२४/प्र.क्र.१११ (भाग-२) / सेवा-१, दि.३०.०१.२०२५.

**२.**सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश, क्र.पदोन्न-११२४/प्र.क्र.१११(भाग-२)(१)/ सेवा-१, दि.०६.०३.२०२५.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील उप विभागीय अभियंता (स्थापत्य) या निम्न संवर्गातील ४ अधिकाऱ्यांना संदर्भाधीन दि.३०.०१.२०२५ रोजीच्या शासन आदेशान्वये कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या वरिष्ठ संवर्गात सन २०२३-२४ च्या नियमित पूरक निवडसूचीतून पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली आहे. तसेच, सदर आदेशातील अनुक्रमांक २ येथील श्री.भंगाळे, उप अभियंता यांची संदर्भाधिन दि.०६.०३.२०२५ रोजीच्या शासन आदेशान्वये सहायक मुख्य अभियंता, सा. बां. प्रा. वि., नांदेड या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली होती. तथापि, श्री.भंगाळे यांनी सुधारित पदस्थापनेबाबत केलेल्या विनंतीनुसार, संदर्भाधिन दि.०६.०३.२०२५ रोजीचा शासन आदेश रद्द करुन, त्यांची कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीने पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव व प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | वाटप झालेला महसूली विभाग | पदोन्नतीने / सुधारित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | २२ / २४.११.२०२३ | श्री.शैलेंद्रकुमार सुरेश भंगाळे. (इ.मा.व.) | उप कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, जळगांव. | छत्रपती संभाजीनगर | कार्यकारी अभियंता, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नांदेड. (रिक्त पदी) |

३. श्री.भंगाळे यांना संदर्भाधिन शासन आदेश, दि.३०.०१.२०२५ मधील परिच्छेद क्र. २ ते १० मध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्ती लागू राहतील. तथापि, श्री.भंगाळे यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०६१६०४४२६४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2025.06.06 16:05:35 +05'30'

**(द. व. खारके)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री (सार्वजनिक उपक्रम) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोंकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
१०. श्री.शैलेंद्रकुमार भंगाळे, उप अभियंता यांना मुख्य अभियंता कार्यालयामार्फत,
११. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१८. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अवर सचिव (प्रशा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. कार्यासन अधिकारी (सेवा-६ / संगणक कक्ष) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.